

**अ.शा. पत्र क्र.: जनगणना २०१०/प्र.क्र.१८६/५**

**सामान्य प्रशासन विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १६ एप्रिल, २०१०.**

जे. पी. डांगे
मुख्य सचिव

प्रिय ———

**विषय : जनगणना-२०११ साठी शासकीय/निम शासकीय कर्मचारीवर्ग उपलब्ध करण्याबाबत.**

महाराष्ट्र राज्यात जनगणना-२०११ चा पहिला टप्पा - घरयादी बनविणे - दिनांक १ मे, २०१० ते १५ जून, २०१० या कालावधीत हाती घेतला जाणार आहे. तसेच जनगणनेचा दुसरा टप्पा - प्रत्यक्ष जनगणना- दिनांक ९ फेब्रुवारी, २०११ ते ५ मार्च, २०११ या कालावधीत हाती घेतला जाणार आहे.

२. जनगणनेच्या कामासाठी आवश्यक अधिकारी/कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन देण्याच्या सूचना शासन पृष्ठांकन, सामान्य प्रशासन विभाग, सम क्रमांक, दिनांक ०९.०४.२०१० अन्वये सर्व मंत्रालयीन विभागांना देण्यात आल्या आहेत. या संदर्भात राज्यातील काही प्रधान जनगणना अधिका-यांनी असे निदर्शनास आणले आहे की, जनगणना - २०११ च्या कामासाठी आवश्यक कर्मचारीवर्ग देण्याची विनंती करुनही तो उपलब्ध करुन देण्यास शासकीय/निम शासकीय कार्यालये /विभाग पुरेश्या प्रमाणात उपलब्ध करुन देण्यास टाळाटाळ करीत आहेत. या संदर्भात आपल्या निदर्शनास आणण्यात येते की, जनगणना अधिनियम, १९४८ च्या कलम ४ व ५ अन्वये शासकीय/निम शासकीय तसेच स्थानिक स्वराज्य संस्थेचे अधिकारी/कर्मचारी जनगणना कामासाठी उपलब्ध करुन देणे बंधनकारक आहे. तसेच हे कार्य करण्यास टाळाटाळ केल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुद्ध जनगणना अधिनियम, १९४८ च्या कलम ४ (२) व भारतीय दंड प्रक्रिया संहिता कलम १८७ नुसार कायदेशीर कारवाई होऊ शकते. तसेच जनगणना हा राष्ट्रीय कार्यक्रम आहे. जनगणनेच्या कामासाठी नियुक्त केलेल्या कर्मचा-यांनी त्यांचे स्वतःचे मूळ काम सांभाळून रोज दोन तास जनगणनेचे काम करावयाचे आहे. तरी या सर्व बाबी विचारात घेऊन सर्व मंत्रालयीन विभागांनी व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी जनगणना - २०११ यासाठी जनगणना अधिकारी यांनी केलेल्या मागणीनुसार आवश्यक कर्मचारीवर्ग तात्काळ उपलब्ध करुन द्यावा. तसेच संबंधीत जनगणना अधिका-यांशी प्रत्यक्ष विचारविनिमय करुन जनगणनेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या कर्मचा-याने दिवसाच्या कोणत्या दोन तासांत जनगणनेचे काम करावयाचे आहे हे निश्चित करुन घेऊन संबंधीत कर्मचा-यांच्या सेवा जनगणनेसाठी तात्काळ उपलब्ध करुन द्याव्यात.

आपला, ———

(जे. पी. डांगे)

**प्रति,**

सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव/ सर्व मंत्रालयीन विभाग.

census letter 307

**census letter 334**

**प्रत -** माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगरपालिका आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी.